सन २०२३ मधील नियतकालिक बदली आदेशामध्ये सुधारीत पदस्थापना (डॉ. शिला सांडूजी बनकर, पशुधन विकास अधिकारी, गट-अ)

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन आदेश क्र .पसंप्र -२०२३/प्र.क्र.५१/पदुम-१**

मंत्रालय विस्तार,मादाम कामा मार्ग, दालन क्र. ५१८,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२

दि. २१/०८/२०२३

**संदर्भ:-** १) शासन आदेश क्र. पसंप्र-२०२३/प्र.क्र.५१/पदुम-१, दि.१५.५.२०२३ व दि.३०.६.२०२३

**शासन आदेश:-**

बदली अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार पशुसंवर्धन विभागातील पशुधन विकास अधिकारी, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने नियतकालिक बदल्याबाबतचे संदर्भाधिन आदेश दि.१५.०५.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आले असून त्यापैकी काही अधिकाऱ्यांच्या सुधारीत पदस्थापनेचे आदेश दि.३०.६.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आलेले आहेत. संदर्भाधिन दि.३०.६.२०२३ रोजीच्या आदेशान्वये डॉ. शिला सांडूजी बनकर, पशुधन विकास अधिकारी यांची पविअ, जिल्हा पशु सर्वचिकित्सालय, नागपूर येथे केलेल्या पदस्थापनेचे पद रिक्त नसल्याने डॉ. बनकर यांना रुजू होता आलेले नाही. याअनुषंगाने डॉ. शिला सांडूजी बनकर, पशुधन विकास अधिकारी ह्या पदस्थापनेच्या प्रतिक्षेत असल्याने बदलीसंदर्भात त्यांच्या सुधारीत पदस्थापनेच्या अनुषंगाने महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने, डॉ. शिला सांडूजी बनकर, पशुधन विकास अधिकारी यांच्या संदर्भाधिन बदली आदेशामध्ये अंशत: बदल करुन आता त्यांच्या नावासमोरील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची सुधारित पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | दि.३०.६.२०२३ च्या आदेशान्वये झालेली बदली | स्तंभ ३ येथील पदस्थापनेत बदल करुन सुधारित पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | डॉ. शिला सांडूजी बनकर, पशुधन विकास अधिकारी | पविअ, जिल्हा पशु सर्वचिकित्सालय, नागपूर | पविअ, अतिशित रेत प्रयोगशाळा, जि. नागपूर |

२. उपरोक्त तक्त्यातील बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदली आदेश प्राप्त होताच सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब सादर करावा.

३. आयुक्त, पशुसंवर्धन, पुणे यांना कळविण्यात येते की, विहीत कालावधीत संबंधित अधिकारी रूजू न झाल्यास अथवा त्यांना कार्यालय प्रमुखांनी कार्यमुक्त/रुजू करण्याची कार्यवाही तात्काळ न केल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करावी व तसा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. याबाबतच्या कार्यवाहीचा अहवाल mansing.patil@nic.in या इ-मेल वर सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२११७२९११२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MANSING UTTAMRAO PATIL

Digitally signed by MANSING UTTAMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3ba28caa058b8cad7f6c3793fb39c98ab0287353f024576ece2b3e8f549e614b, pseudonym=39C570EEDB4A04D696EC0B6B3139807360777302, serialNumber=8B399521097196419264C059F0A083B9DB52ECFAFA693832FAEA6ED15299044C, cn=MANSING UTTAMRAO PATIL
Date: 2023.08.21 17:31:51 +05'30'

**( मानसिंग पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) सह आयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) प्रादेशिक पशुसंवर्धन सह आयुक्त, नागपूर
५) जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त, नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८) संबंधित अधिकारी, आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे मार्फत.
९) निवड नस्ती.